# महाराष्ट्र विधानपरिषद

## पहिले (अर्थसंकल्पीय) अधिवेशन, २०२३

---

### अतारांकित प्रश्नोत्तरांची यादी

### प्रश्नांची एकूण संख्या - २०

---

### राज्यातील अनधिकृत शाळांवर कारवाई होत नसल्याबाबत

**(१) १५१५५ (०५-१२-२०२२) श्री.सुनिल शिंदे, श्री.विलास पोतनीस, डॉ.(श्रीमती) मनिषा कायंदे, श्री.राजहंस सिंह, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील आणि शहरातील अनधिकृत शाळांची यादी दरवर्षी शिक्षण विभागाकडून जाहीर करण्यात येत असून या अनधिकृत शाळांवर कोणतीही कारवाई करण्यात येत नसल्याने अनधिकृत शाळांची संख्या वाढत असल्याचे माहे सप्टेंबर, २०२२ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, बृहन्मुंबई महानगरपालिका विभागात सर्वाधिक २२३, ठाणे १४९ व पालघर १४३ या शाळांनी शासनाची मान्यता न घेता बेकायदेशीर शाळा सुरु केली असल्याने विद्यार्थ्यांचे शैक्षणिक होण्याची शक्यता निर्माण झाली आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, मुंबईतील वरळी विभागातील जनता शिक्षण संस्थेमध्ये अनेक विद्यार्थी शिक्षण घेत आहेत, परंतु विद्यार्थ्यांच्या दहावी परीक्षेचे अर्ज शाळेला मान्यता नसल्यामुळे राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळाकडून स्वीकारले जात नसल्याचे निदर्शनास आले आहे, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, मान्यता नसलेल्या शाळांवर कारवाई होत नसल्याने त्या शाळांमध्ये शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यांचे शैक्षणिक वर्ष वाया जाण्याची भिती विद्यार्थी व पालकांमध्ये निर्माण झाली आहे, तसेच या अनधिकृत शाळांना दंड ठोठावण्याच्या नोटिसा बजावण्यात येतात, परंतु कोणतीही कारवाई होत नाही त्यामुळे या अनधिकृत शाळांवर तात्काळ कारवाई व्हावी, अशी पालकांकडून मागणी होत आहे, हे ही खरे आहे काय,

(५) असल्यास, उक्त प्रकरणी चौकशी केली आहे काय, त्यात काय आढळून आले तद्नुषंगाने अनधिकृत शाळांवर कोणती कारवाई केली वा करण्यत येत आहे,

(६) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत?

**श्री.दिपक केसरकर (२१-१२-२०२२) :** (१) हे खरे नाही.
(२) बृहन्मुंबई महानगरपालिका विभागात २२३, ठाणे जिल्ह्यात १४९ व पालघर जिल्ह्यात १४३ शाळा मान्यता न घेता सुरु असल्याचे निर्दशनास आले आहे. सदर शाळांवर बालकांचा मोफत व सक्तीच्या शिक्षणाचा अधिकार अधिनियम, २००९ मधील कलम १८(५) नुसार कारवाई करण्यात येते. अनधिकृत शाळांतील विद्यार्थ्यांचे नजीकच्या मान्यता प्राप्त शाळांमध्ये समायोजन करण्यात येत असल्याने विद्यार्थ्यांचे शैक्षणिक नुकसान होत नाही.
(३) हे खरे आहे. तथापि, जनता शिक्षण संस्था, वरळी संचलित सनराईज इंग्लिश स्कूल, वरळी या शाळेतील विद्यार्थ्यांना मार्च, २००३ च्या माध्यमिक शालांत परीक्षेकरीता शारदाश्रम विद्यामंदिर, दादर या शाळेतून बसविण्यास परवानगी देण्यात आली आहे.
(४) व (५) राज्यातील मान्यता न घेता अनधिकृतपणे सुरु असलेल्या शाळांवर बालकांचा मोफत व सक्तीच्या शिक्षणाचा अधिकार अधिनियम, २००९ मधील कलम १८(५) नुसार कारवाई करण्यात येते आहे.
(६) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## क्षयरोग रुग्णालय समुह, शिवडी (मुंबई) येथील वैद्यकीय अधिकारी (डॉक्टर), परिचारिका तसेच पॅरामेडिकल कर्मचाऱ्यांची रिक्त पदे भरण्याबाबत

**(२) १५२२३ (२५-११-२०२२) श्री.विजय ऊर्फ भाई गिरकर, श्री.प्रविण दरेकर, ॲड.निरंजन डावखरे, श्री.रमेशदादा पाटील, श्री.रमेश कराड :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) बृहन्मुंबई महानगरपालिकेच्या शिवडी (मुंबई) येथील क्षयरोग (टीबी) रुग्णालयातील वैद्यकीय अधिकारी (डॉक्टर), परिचारीका तसेच पॅरामेडिकल कर्मचाऱ्यांची ४० टक्के पदे रिक्त असल्याने येथील रुग्णसेवेवर परिणाम होत असल्याचे माहे ऑक्टोबर, २०२२ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, सदर रिक्त पदांमुळे एका डॉक्टरवर २० रुग्णांचा भार येत असून कर्मचाऱ्यांवर देखील कामाचा अतिरिक्त ताण येत आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, रुग्णालयात अनेक डॉक्टर कंत्राटी पध्दतीने काम करित असून डॉक्टरांच्या नियुक्तीचा प्रस्ताव रुग्णालय प्रशासनाने वरिष्ठांकडे पाठवूनही अनेक महिन्यांपासून डॉक्टरांची नियुक्ती झाली नाही, हे ही खरे आहे काय,
(४) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने क्षयरोग रुग्णालय समुह, शिवडी (मुंबई) येथील रिक्त पदे भरण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.एकनाथ शिंदे (१३-१२-२०२२) :** (१) बृहन्मुंबई महानगरपालिकेच्या शिवडी (मुंबई) येथील क्षयरोग रुग्णालयातील वैद्यकीय अधिकारी (डॉक्टर), परिचारीका तसेच पॅरामेडिकल कर्मचाऱ्यांची ४० टक्के पदे रिक्त आहेत. तसेच, सदर रुग्णालयातील मागील ३ ते ४ वर्षे दुरुस्तीच्या कामांमुळे १०२४ खाटांऐवजी ५४१

खाटा कार्यरत आहेत. सदर रुग्णालय ५०% क्षमतेने सुरु असल्यामुळे कार्यरत कर्मचारी सदर रुग्णालयीन सेवेसाठी सद्य:स्थितीत पुरेसे आहेत, असे बृहन्मुंबई महानगरपालिकेने कळविले आहे.
(२) व (३) सदर रुग्णालयाच्या आस्थापनेवर ४४ वैद्यकीय अधिकारी असून, त्यापैकी २० वैद्यकीय अधिकारी कार्यरत आहेत व रिक्त २४ पदांवर गरजेनुसार कंत्राटी वैद्यकीय अधिकारी घेण्यात आले आहेत.

सदर २४ वैद्यकीय अधिकाऱ्यांची पदे महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत भरण्याकरीता पुढील कार्यवाही सुरु आहे, असे बृहन्मुंबई महानगरपालिकेने कळविले आहे.
(४) सदर रुग्णालयातील परिचारिका संवर्गाची बिंदूनामावली पडताळणीची कार्यवाही पूर्ण झाली असून, एकूण ३७१ पदांपैकी २८१ पदे भरली आहेत व ९० पदे रिक्त आहेत. सदर रिक्त पदे भरण्याची कार्यवाही सुरु आहे.

तसेच, पॅरामेडिकल संवर्गातील ७८ पदांपैकी ५१ पदे भरली आहेत व २७ पदे रिक्त आहेत. औषध निर्माण अधिकारी, प्रयोगशाळा तंत्रज्ञ इ. पॅरामेडिकल कर्मचाऱ्यांची रिक्त पदे भरण्याची कार्यवाही सुरु आहे, असे बृहन्मुंबई महानगरपालिकेने कळविले आहे.
(५) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## पुणे जिल्ह्यातील मागासवर्गीय विद्यार्थी शिष्यवृत्तीच्या लाभापासून वंचित असल्याबाबत

**(३) १५२२८ (२५-११-२०२२) श्री.विजय ऊर्फ भाई गिरकर, श्री.प्रविण दरेकर, ॲड.निरंजन डावखरे, श्री.रमेशदादा पाटील, श्री.रमेश कराड :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) पुणे जिल्ह्यातील उच्च शिक्षण घेत असलेले ५२६ मागासवर्गीय विद्यार्थी मागील ५ वर्षांपासून शिष्यवृत्तीच्या लाभापासून वंचित असल्याचे माहे ऑक्टोबर, २०२२ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, शिष्यवृत्तीचा लाभ मिळण्याबाबत मागासवर्गीय विद्यार्थ्यांनी शिक्षण संचालक, पुणे यांचेकडे वारंवार तक्रारी करुनही विद्यार्थ्यांना शिष्यवृत्तीचा लाभ मिळत नसल्याने विद्यार्थ्यांना शैक्षणिक खर्च भागवितांना गैरसोय होत आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन पुणे जिल्ह्यातील मागासवर्गीय विद्यार्थ्यांचे प्रलंबित शिष्यवृत्ती अदा करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.एकनाथ शिंदे (१५-१२-२०२२) :** (१) अंशत: खरे आहे
(२) हे खरे नाही.
(३) मागासवर्गीय विद्यार्थ्यांचे प्रलंबित शिष्यवृत्ती अदा करण्याच्या दृष्टीने शासनस्तरावरून तसेच समाज कल्याण आयुक्तालय स्तरावरून राज्यातील सर्व क्षेत्रिय कार्यालयांना त्यांच्या अधिनस्त जिल्ह्यातील सर्व महाविद्यालयांना महाविद्याल स्तरावरील प्रलंबित अर्ज तात्काळ निकाली काढण्याच्या दृष्टीने सूचना

निर्गमित करण्यात आलेल्या आहेत. त्यानुसार संबंधित सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण पुणे यांच्या कार्यालयामार्फत महाविद्यालयांना वेळोवेळी लेखीस्वरुपात तसेच व्हिडिओ कॉन्फरन्स व प्रत्यक्ष कार्यशाळा घेऊन अर्ज निकाली काढण्याच्या सूचना निर्गमित केलेल्या आहेत.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यातील कनिष्ठ महाविद्यालयांचे भवितव्य धोक्यात आल्याबाबत

**(४) १५५३२ (०५-१२-२०२२) श्री.प्रवीण दटके, श्री.प्रविण दरेकर, ॲड.निरंजन डावखरे, श्री.रमेश कराड, श्रीमती उमा खापरे, श्री.प्रसाद लाड, श्री.अभिजित वंजारी, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्री.राजेश राठोड :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यात शहरी भागातील कनिष्ठ महाविद्यालयांतील ११ वी प्रवेशासाठी राबविण्यात आलेल्याऑनलाईन प्रवेश प्रक्रियेमुळे १ लाख ८१ हजार जागा रिक्त असल्याने कनिष्ठ महाविद्यालये बंद होण्याच्या मार्गवर असल्याचे दिनांक २७/०९/२०२२ रोजी वा त्या सुमारास निदर्शनास आले आहे, हे खरेआहे काय,
(२) असल्यास, राज्यातील या महाविद्यालयांतील शेकडो शिक्षक अतिरिक्त होणार असून त्यांच्या समायोजनासाठी गंभीर समस्या निर्माण झाली आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, इयत्ता ११ वी ऑनलाईन प्रवेश प्रक्रियेतील आर्थिक घोटाळ्याची उच्चस्तरीय चौकशी करण्याबाबत नागपूर विभागाच्या शिक्षक जनप्रतिनिधींनी दिनांक ०६/०६/२०२२ रोजी शिक्षण उपसंचालक, नागपूर विभाग यांना निवेदन पाठवून दोषींविरुध्द दंडात्मक कारवाई करण्याची मागणी केली आहे, हे ही खरे आहे काय,
(४) असल्यास, उक्त प्रकरणी चौकशी केली आहे काय, त्यात काय आढळून आले तदनुषंगाने महाविद्यालयांतील शेकडो अतिरिक्त शिक्षकांचे समायोजनाबाबत, तसेच महाविद्यालयात अधिकाअधिक ११ वी प्रवेश व्हावेत तसेच इयत्ता ११ वी ऑनलाईन प्रवेश प्रक्रियेतील आर्थिक घोटाळ्याची उच्चस्तरीय चौकशी करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.दिपक केसरकर (२१-१२-२०२२) :** (१) व (२) हे खरे नाही.
(३) यासंदर्भात नागपूर विभागाच्या मा.लोकप्रतिनिधी यांनी दिनांक ०६/०६/२०२२ रोजी शिक्षण उपसंचालक, नागपूर विभाग यांना पत्र दिले आहे.
(४) इ.११ वी ऑनलाईन प्रवेश प्रक्रियेमुळे अनुदानित कनिष्ठ महाविद्यालये बंद होणार नसल्याने शिक्षक अतिरिक्त ठरण्याचा प्रश्न उद्भवत नाही. तसेच इ.११ वी ऑनलाईन प्रवेश प्रक्रिया ही पूर्णत: ऑनलाईन व पारदर्शक पध्दतीने राबविण्यात येत असल्याने आर्थिक घोटाळा होण्याचा प्रश्न उद्भवत नाही.
(५) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यातील सर्व शाळांमध्ये मराठी भाषेचे अध्यापन व अध्ययन सक्तीचे करण्याबाबत

**(५) १५५४४ (०५-१२-२०२२) श्री.प्रवीण दटके, श्री.प्रविण दरेकर, श्री.विजय ऊर्फ भाई गिरकर, श्री.रमेश कराड, ॲड.निरंजन डावखरे, श्रीमती उमा खापरे, श्री.प्रसाद लाड :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील सर्व शाळांमध्ये मराठी भाषेचे अध्यापन व अध्ययन सक्तीचे करण्यासाठी आणि तत्संबंधी किंवा तद्नुषंगिक बाबींसाठी तरतूद करण्याकरीता केलेल्या दिनांक ९ मार्च, २०२० रोजी प्रसिध्द केलेला अधिनियम २०२० वर आधारित नियमावलीचा मसुदा सादर करण्याची कार्यवाही सुरू असल्याचे मा.शालेय शिक्षण मंत्री यांनी सभागृहात निवेदन केले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास या प्रकरणी दिनांक ९ मार्च, २०२० रोजी प्रसिध्द केलेला अधिनियम, २०२० वर आधारित नियमावलीचा मसुदा सादर करण्याची कार्यवाही पूर्ण झाली आहे काय,
(३) असल्यास, नियमावलीचा मसुदा थोडक्यात काय आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.दिपक केसरकर (१४-१२-२०२२) :** (१) हे खरे आहे.
(२) दिनांक ९ मार्च, २०२० रोजी प्रसिध्द केलेला अधिनियम, २०२० वर आधारित नियमावलीचा मसुदा विधी व न्याय विभागाकडून तपासण्यात येत आहे.
(३) या नियमावली मसुद्यामध्ये एकूण १६ नियम तयार करण्यात आलेले आहेत. या मसुद्यामध्ये नियमावलीमधील महत्वाच्या संज्ञांचे व्याख्या स्वरूपात स्पष्टीकरण देण्यात आलेले आहे. मराठीचा सक्तीचा विषय म्हणून शाळांमध्ये इयत्ता निहाय अंमलबजावणी कालावधी, अभ्यासक्रम इ.बाबत नियम करण्यात आलेले आहे. तसेच सदर अधिनियमातील तरतुदींचे उल्लंघन झाल्यास त्याबद्दलची शास्ती कोणती असेल ? अशा शास्तीची प्रक्रिया काय असेल ? याबाबत सक्षम प्राधिकारी कोण असेल ? पुनर्विलोकन यंत्रणा कोणती याबाबतचे नियम तयार करण्यात आलेले आहेत.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## सावित्रीबाई फुले विद्यापीठ, पुणे अंतर्गतच्या महाविद्यालयातील विधी अभ्यासक्रमाच्या विद्यार्थ्यांनी बेमुदत उपोषण केल्याबाबत

**(६) १५६६४ (०५-१२-२०२२) श्री.महादेव जानकर :** सन्माननीय **उच्च व तंत्र शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) सावित्रीबाई फुले विद्यापीठ, पुणे येथील महाविद्यालयातील विधी अभ्यासक्रमाच्या निकालात अनियमितता झाल्यामुळे त्याविरोधात महाविधी लॉ स्टुडंटस असोसिएशनच्यावतीने दिनांक ११ ऑक्टोबर, २०२२ रोजी पासून विद्यार्थ्यांनी बेमुदत उपोषण सुरु केले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, विद्यार्थ्यांनी विद्यापीठाने लागू केलेली स्केल डाऊन पध्दती काढून टाकावी, अनुतीर्ण विद्यार्थ्यांची पुन्हा तातडीने परीक्षा घ्यावी, जर ५० टक्के विद्यार्थी नापास होत असतील तर गंभीर बाब आहे, त्यामुळे यावर तज्ञ समिती स्थापन करावी, तसेच यामध्ये दोषी असणाऱ्या शिक्षकांवर कारवाई करावी, यासह विविध मागण्यांच्या अनुषंगाने उपोषण सुरु केले असून जोपर्यंत मागण्यांवर लेखी उत्तर मिळत नाही तोपर्यंत उपोषण मागे न घेण्याचा इशारा विद्यार्थ्यांनी दिला आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, याबाबत शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने विद्यार्थ्यांच्या उक्त मागण्यांसदर्भात कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत

**श्री.चंद्रकांत (दादा) पाटील (१४-१२-२०२२) :** (१) होय, हे खरे आहे.
(२) हे खरे नाही.

विधी सन २०१७ अभ्यासक्रमातील तरतुदीनुसार स्केल डाऊन पध्दत लागू असून निकाल जाहीर करण्यात आलेले आहेत. तसेच निकाल प्रक्रिया विद्यापरिषद, परीक्षा व मूल्यमापन मंडळ, अधिकारी मंडळाने निश्चित केलेल्या नियमानुसार सार्वजनिक विद्यापीठ अधिनियम कलम ४८(३) अन्वये पात्र प्राध्यापकांकडून उत्तरपत्रिका तपासणी झाली आहे. एल.एल.बी. तीन वर्षीय अभ्यासक्रमाचा निकाल ६६.१४% लागलेला आहे. तसेच बी.ए.एल.एल.बी. पाच वर्षीय अभ्यासक्रमाचा निकाल ८५.६७% लागलेला असून अनेक विद्यार्थी उत्तम गुणाने उत्तीर्ण झालेले आहेत.
(३) व (४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## नवी मुंबई शहरातील सीबीडी ते दिघा दरम्यानच्या खड्ड्यांची दुरुस्ती करण्याबाबत

**(७) १५६८७ (२५-११-२०२२) श्री.रमेशदादा पाटील :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) नवी मुंबई शहरातील खड्डे दुरुस्तीकडे ठेकेदारांनी दुर्लक्ष केल्याने सीबीडी ते दिघा दरम्यान असलेले अंतर्गत रस्ते, उड्डाणपुल, भुयारी मार्गामध्ये खड्डे पडले असल्याचे माहे ऑक्टोबर, २०२२ च्या शेवटच्या आठवड्यात निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, सदर खड्ड्यांमुळे वाहतूकदार व प्रवाशांची गैरसोय होत असून अपघाताचे प्रमाणही वाढले आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने नवी मुंबई शहरातील खड्डे दुरुस्ती/बुजविण्यासाठी कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.एकनाथ शिंदे (१५-१२-२०२२) :** (१) हे खरे नाही.
(२) हे खरे नाही.

रस्त्यांवरील खड्ड्यांमुळे कुठलाही अपघात घडल्याची नोंद झालेली नाही.

(३) • नवी मुंबई महानगरपालिका क्षेत्रात एकूण ५०५ कि.मी. लांबीचे रस्ते आहेत. त्यापैकी एमआयडीसी क्षेत्रात १३६ कि.मी. लांबीचे रस्ते आहेत.

• नवी मुंबई महानगरपालिका क्षेत्रातील रस्ते वेळोवेळी दुरूस्त करून सुस्थितीत ठेवले जातात. यासाठी महानगरपालिकेने बेलापूर ते दिघा या विभाग कार्यालय, क्षेत्रात विभागनिहाय वार्षिक ठेकेदारांची नेमणूक केलेली आहे.

• ठेकेदारांमार्फत सर्व रस्त्यांवरील खड्डे भरणे, लेन मार्कींग, दुभाजक रंगविणे व रस्ते सुस्थितीत ठेवण्याचे काम करण्यात येते.

• रस्त्यांवरील खड्ड्यांबाबत नागरिकांकडून Whats app व grievance portal वर प्राप्त झालेल्या तक्रारी Daksh App, द्वारे ठेकेदारास पाठविल्या जात असून, त्यावर ठेकेदारामार्फत २४ तासांत कार्यवाही करण्यात येते.

• नवी मुंबई महानगरपालिका क्षेत्रातील रस्त्यांसंदर्भात प्राप्त तक्रारींनुसार कंत्राटदाराने कार्यवाही न केल्यास प्रति दिन, प्रति खड्डा रुपये १००/- याप्रमाणे कंत्राटदारावर दंडात्मक कार्यवाही करण्यात येत असल्याचे, नवी मुंबई महानगरपालिकेने कळविले आहे.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## नवी मुंबईतील आगरी-कोळी युथ फाऊंडेशनच्या मागण्यांबाबत

**(८) १५६८९ (२५-११-२०२२) श्री.रमेशदादा पाटील, श्रीमती उमा खापरे, ॲड.निरंजन डावखरे, श्री.रमेश कराड :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) नवी मुंबई महानगरपालिकेकडे सिडको विकास मानांकनाप्रमाणे २७३५ हेक्टर एवढे क्षेत्र नागरी सुविधांकरीता असणे अपेक्षित असताना महानगरपालिकेकडे केवळ २०२६ हेक्टर क्षेत्र उपलब्ध असल्याने ७०९ हेक्टर नागरी सुविधा क्षेत्र महानगरपालिकेच्या क्षेत्रातून कमी झाल्याची तक्रार आगरी-कोळी युथ फाऊंडेशनने महानगरपालिकेकडे केल्याचे माहे सप्टेंबर, २०२२ च्या शेवटच्या आठवड्यात निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, मूळ आणि विस्तारित गावठाणासाठी स्वतंत्र विकास आराखडा प्रसिध्द करणे आणि घणसोली येथील संपूर्ण सेक्टर १२ वरील क्रीडा संकुलाचे आरक्षण पूर्ववत करण्यात यावे व अन्य मागण्या आगरी-कोळी युथ फाऊंडेशनने केल्या आहेत, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन आगरी-कोळी युथ फाऊंडेशनने केलेल्या तक्रारी व मागण्यांबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.एकनाथ शिंदे (१३-१२-२०२२) :** (१) आगरी-कोळी युथ फाऊंडेशनचे दिनांक १९/०९/२०२२ रोजीचे विकास योजनेस हरकत/ सूचनेचे पत्र नवी मुंबई महानगरपालिकेस प्राप्त झाले आहे.

(२), (३) व (४) नवी मुंबई महानगरपालिकेने, महाराष्ट्र प्रादेशिक व नगर रचना अधिनियमाचे कलम २६(१) अन्वये नवी मुंबई महानगरपालिका क्षेत्राची प्रारुप विकास योजना तयार करुन, जनतेकडून हरकती/ सूचना मागविण्यासाठी दिनांक १०/०८/२०२२ रोजी प्रसिध्द केली आहे. संचालक, नगर रचना, महाराष्ट्र राज्य यांनी दिनांक ३०/११/२०२२ रोजीचे आदेशाद्वारे कलम २८(२) अन्वये नियोजन समिती गठीत केली असून त्यानुसार विहित मुदतीत प्राप्त झालेल्या हरकती/ सूचना अर्जांवर सदर नियोजन समितीमार्फत सुनावणी देण्याची कार्यवाही प्रस्तावित आहे. नियोजन प्राधिकरण म्हणून नवी मुंबई महानगरपालिकेने उक्त अधिनियमातील तरतुदीनुसार वैधानिक कार्यवाहीसंबंधी पूर्तता करुन प्रारुप विकास योजना कलम ३० अन्वये शासनास मंजूरीसाठी सादर करणे अभिप्रेत असून त्यावर कलम ३१(१) अन्वये शासनाने निर्णय घेण्याची तरतूद आहे. त्यानुसार सदर अर्जावर नियमानुसार कार्यवाही होणार आहे.

---

## नवी मुंबईतील सिडको वसाहतीतील इमारतींचे अभिहस्तांतर रखडलेबाबत

**(९) १५७९३ (१०-१२-२०२२) :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) नवी मुंबईतील कामोठे, करंजाडे, खारघर आणि रोडपाली या सिडको वसाहतीत अनेक इमारतींचे अभिहस्तांतर (कन्व्हेयन्स डीड) झालेले नसून सन २०१० च्या अगोदर बांधकाम व्यावसायिक आणि शेतकऱ्यांनी मावेजा रक्कम न भरल्याने अभिहस्तांतरणात प्रलंबित असल्याचे माहे नोव्हेंबर, २०२२ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सिडकोने अनेक वसाहती साडेबारा टक्के भूखंडांवर विकसित करुन शेतकऱ्यांना मिळालेल्या भूखंडावर विकासकानी करार करुन इमारती उभारल्या, सन २०१० पर्यंत ज्या इमारतींचे बांधकाम पूर्ण झाले त्या इमारतीतील रहिवाशांनी कर्ज काढून घरे घेतली व तद्नंतर गृहनिर्माण सोसायटी स्थापन केल्यानंतर बांधलेल्या इमारतींची जागा हस्तांतरणाचा प्रश्न निर्माण झाला आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, वसाहतीमधील रहिवाशांनी सन २००० नंतर कर्ज काढून घरे घेतली असून त्यावेळी सिडकोने वाढीव मावेजाबद्दल कोणतीही सूचना दिली नव्हती, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, इमारतीमधील रहिवाशांनी एकत्र येऊन वीज, पाणी इ. साठी वर्गणी घेतली असून वाढीव मावेजाची रक्कम व त्यावरील व्याज देणे हे सर्वसामान्य नागरिकांना परवडणारे नाही, हे ही खरे आहेत,

(५) असल्यास, सिडकोच्या चुकीमुळेच सन २०१० पूर्वीचे जमीन हस्तांतराचे प्रश्न किचकट झाले असल्याने याप्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने नवी मुंबईतील सिडको वसाहतीतील इमारतींचे अभिहस्तांतर करण्यासाठी कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(६) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.एकनाथ शिंदे (२०-१२-२०२२) :** (१) व (२) हे अंशत: खरे आहे,

नवी मुंबई प्रकल्पासाठी संपादित करण्यात आलेल्या जमिनीच्या बदल्यात पात्र प्रकल्पग्रस्तांना शासन निर्णय दिनांक ०६/०३/१९९० व दिनांक २८/१०/१९९४ अन्वये १२.५% योजनेंतर्गत विकसित भूखंडाचे वाटप सिडकोमार्फत करण्यात येते. सदर वाटप करतांना भूखंडाची भाडेपट्टा रक्कम (Lease Premium) निश्चित करण्यात येते.

तसेच शासन निर्णय, दिनांक २८/०९/१९९८ नुसार विहित हस्तांतरण शुल्क आकारुन त्रिपक्षीय करारनामाद्वारे भूखंडांचे हस्तांतरण करण्यात येते. तथापि, भाडेपट्टा करारनामा भूखंडधारकाने वाढीव नुकसान भरपाईची रक्कम घेतल्यास त्या रकमेच्या प्रमाणात भूखंडधारकाने अतिरिक्त भाडेपट्ट्याची रक्कम भरणे बंधनकारक आहे. परवानाधारकाने भाडेपट्टा करारनाम्यातील अटी व शर्तीनुसार विहित वेळेत बांधकाम करुन भोगवटा प्रमाणपत्र घेतल्यानंतर व अतिरिक्त भाडेपट्टा भरल्यानंतर इमारतींचे अभिहस्तांतरण (कन्हेअन्स डीड) करण्यात येते. सदर बाबींची पूर्तता न झाल्याने संबंधित इमारतींचे अभिहस्तांतरण प्रलंबित आहे.

(३) व (४) प्रकल्पग्रस्त शेतकऱ्याने वाढीव नुकसान भरपाई घेतल्यास संबंधित भूखंडधारक /परवानाधारक यांनी सिडकोच्या भाडेपट्टा करारनाम्यातील अटी व शर्तीनुसार अतिरिक्त भाडेपट्ट्याची रक्कम भरण्याची तरतूद आहे. यानुसार सदर रक्कम भरणे बंधनकारक आहे.

(५) यासंदर्भात सेवानिवृत्त मुख्य सचिव यांचे अध्यक्षतेखाली शासन निर्णय दिनांक १७/१०/२०२२ अन्वये समिती गठीत करण्यात आली आहे.
(६) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## गोवंडी (मुंबई) येथील पंडित मदन मोहन मालवीय शताब्दी रुग्णालयातील अपुऱ्या कर्मचारीवृंदांमुळे रुग्णांना आरोग्य सोयी सुविधा मिळत नसल्याबाबत

**(१०) १५८३६ (०३-१२-२०२२) श्रीमती उमा खापरे, ॲड.निरंजन डावखरे, श्री.रमेश कराड :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) गोवंडी (मुंबई) येथील महानगरपालिकेचे पंडित मदन मोहन मालवीय शताब्दी रुग्णालयात रुग्णांना विविध आरोग्य सोयी सुविधा मिळत नसल्याचे माहे सप्टेंबर, २०२२ च्या शेवटच्या आठवड्यात निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास गोवंडी शताब्दी रुग्णालयात चेंबूर, गोवंडी, मानखुर्द, शिवाजीनगर, अनुशक्ती नगर, वाशी नाका, ट्रॉम्बे चिता कॅम्प, माहुलगाव आणि गाव गव्हाणगाव भागातील रुग्णांना आरोग्याच्या सोयी सुविधा मिळत नसल्याची तक्रार स्थानिक नागरिकांनी शासनाकडे केली आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन गोवंडी शताब्दी रुग्णालयात सर्व अद्ययावत सोयी सुविधा आणि पुरेसे कर्मचारी देण्यासाठी कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.एकनाथ शिंदे (२०-१२-२०२२) :** (१) हे खरे नाही.

पंडित मदन मोहन मालवीय शताब्दी रुग्णालय हे बृहन्मुंबई महानगरपालिकेचे २१० रुग्णशैय्येचे माध्यमिक आरोग्य सेवा देणारे उपनगरीय रुग्णालय आहे. सदर रुग्णालयामध्ये, वैद्यकीय विभाग, शल्यचिकित्सा विभाग, बालरुग्ण विभाग, नाक-कान-घसा विभाग, नेत्र विभाग, अस्थिव्यंग विभाग, प्रसुती व स्त्रीरोगशास्त्र विभाग, मनोविकास विभाग, पॅथॉलॉजी विभाग, क्ष-किरण विभाग, कुटुंब नियोजन विभाग, प्रसुतीपश्चात विभाग, आर.एन.टी.सी.पी. (क्षयरोग) विभाग, व्ही.सी.टी.सी. विभाग, अतिदक्षता विभाग, अपघात विभाग, एम.आर.आय. विभाग, रक्तपेढी, डायलेसिस केंद्र तसेच महात्मा ज्योतीबा फुले जन आरोग्य योजना, जीन एक्सपर्ट यांची सेवा उपलब्ध आहेत.

सदर रुग्णालयामध्ये, उपरोक्त विभागांची आंतररुग्ण व संबंधित विभागांच्या शस्त्रक्रिया या सेवा, सी.टी. स्कॅन व एम.आर.आय. या अद्ययावत निदान सुविधा उपलब्ध आहेत. तसेच रुग्णालयामध्ये सर्व प्रकारची औषधे उपलब्ध असून रुग्णांना मोफत पुरविली जात असल्याचे महानगरपालिकेने कळविले आहे.
(२) गोवंडी शताब्दी रुग्णालयात चेंबूर, गोवंडी, मानखुर्द, शिवाजीनगर, अणुशक्ती नगर, वाशी नाका, ट्रॉम्बे चिता कॅम्प, माहुलगाव आणि गाव गव्हाणगाव भागातील रुग्णांना आरोग्याच्या सोयी सुविधा मिळत नसल्याची तक्रार कार्यासनाच्या अभिरक्षेत आढळून आली नाही.

तसेच अशा स्वरुपाची तक्रार प्राप्त झाली नसल्याचे महानगरपालिकेने देखील कळविले आहे.

(३) सदर रुग्णालयामध्ये अद्ययावत सोयी सुविधा पुरविण्याकरीता महानगरपालिकेमार्फत सन २०२२-२३ मध्ये रुपये ५९.१२ कोटीची तरतूद करण्यात आली आहे. तसेच रुग्णालयातील कामगारांची रिक्त पदे भरण्याकरीता कंत्राटी तत्वावर प्रचलित पध्दतीने बहुउद्देशीय कामगार नियुक्त करण्यात येत असल्याचे बृहन्मुंबई महानगरपालिकेने कळविले आहे.
(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## धाटाव (ता.रोहा, जि.रायगड) औद्योगिक परिसरात वायु प्रदूषण करणाऱ्या कंपन्यांवर कारवाई करण्याबाबत

**(११) १५८६४ (१०-१२-२०२२) श्रीमती उमा खापरे, अॅड.निरंजन डावखरे :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) धाटाव (ता.रोहा, जि.रायगड) औद्योगिक (एमआयडीसी) परिसरातील सात कंपन्यांना प्रदूषण नियंत्रण मंडळाने नोटीस दिली असल्याचे माहे सप्टेंबर, २०२२ च्या शेवटच्या आठवड्यात निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, धाटाव एमआयडीसीतील अनेक कंपन्या पर्यावरणाच्या नियमांचे उल्लंघन करुन विषारी वायुचे प्रदूषण करत असतानाही केवळ सात कंपन्यानाच नोटीस दिल्याने इतर कंपन्यांचा पर्यावरण मंडळाकडून आढावा घेण्यात येणार आहे काय,
(३) असल्यास, धाटाव, रोठ, तळाघर, निवी, वरसे व रोहा या गावातील नागरिकांना कंपन्यांच्या वायू प्रदूषणामुळे उलट्या, मळमळ, डोळे चुरचुरणे, श्वसनाचा त्रास इ. आजार उद्भवू लागले आहे, हे ही खरे काय,
(४) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने वायु प्रदूषण करणाऱ्या रोहा एमआयडीसीतील कंपन्यांवर कारवाई करुन वायु प्रदूषण रोखण्याचे दृष्टीने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.एकनाथ शिंदे (२१-१२-२०२२) :** (१) हे खरे आहे.
(२) धाटाव औद्योगिक क्षेत्रातील उद्योगांची महाराष्ट्र प्रदूषण नियंत्रण मंडळामार्फत वेळोवेळी पाहणी करण्यात येऊन पाहणी दरम्यान दोषी आढळणाऱ्या उद्योगांवर कारवाई करण्यात येते.
(३) हे खरे नाही.

• जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषद, अलिबाग यांचेकडून प्राप्त अहवालानुसार धाटाव औद्योगिक वसाहतीतील उद्योगांमुळे धाटाव, रोठ, तळाघर, निवी, वरसे व रोहा या गावातील नागरिकांच्या आरोग्यास धोका निर्माण झालेला एकही रुग्ण उपचारासाठी प्राथमिक आरोग्य केंद्रात किंवा उपकेंद्रात आलेला नसल्याचे कळविण्यात आले आहे.

(४) • महाराष्ट्र प्रदूषण नियंत्रण मंडळाकडे प्राप्त तक्रारीस अनुसरुन केलेल्या पाहणीदरम्यान दोषी आढळून आलेल्या प्रश्नाधीन ७ कंपन्यांपैकी मे.ट्रान्सवर्ल्ड प्रा.लि. या कंपनीस महाराष्ट्र प्रदूषण नियंत्रण मंडळाने दिनांक ०८/०९/२०२२ रोजी उत्पादन बंद करण्याचे आदेश दिले होते.

• उर्वरित ६ उद्योगांना हवा प्रदूषण संनियंत्रण यंत्रणा शास्त्रोक्त पध्दतीने कार्यान्वित ठेवण्यासाठी महाराष्ट्र प्रदूषण नियंत्रण मंडळाने दिनांक १७/०९/२०२२ रोजीच्या पत्रान्वये कळविण्यात आले होते.

• तद्नंतर मे.ट्रान्सवर्ल्ड फर्टिकेम प्रा.लि. या कंपनीने प्रदूषण यंत्रणेमध्ये सुधारणा केल्यानंतर सदर उद्योगास महाराष्ट्र प्रदूषण नियंत्रण मंडळाने दिनांक १७/०९/२०२२ रोजी अटी व शर्तीस अधिन राहून पुन्हा उत्पादन सुरु करण्याचे आदेश महाराष्ट्र प्रदूषण नियंत्रण मंडळामार्फत देण्यात आले आहेत. तसेच उर्वरित ६ कंपन्यांनी महाराष्ट्र प्रदूषण नियंत्रण मंडळाने दिलेल्या निर्देशानूसार यंत्रणेत सुधारणा केली आहे.

(५) प्रश्न उद्भवत नाही.

---

## पाथरी (जि.परभणी) येथील श्री साईबाबा तीर्थक्षेत्र विकास आराखड्याच्या मंजूरीबाबत

**(१२) १५९४८ (०३-१२-२०२२) श्री.अब्दुल्लाखान दुर्राणी, श्री.सतिश चव्हाण, श्री.विक्रम काळे, श्री.शशिकांत शिंदे : तारांकित प्रश्न क्रमांक १३७६२ ला दिनांक २४ ऑगस्ट, २०२२ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) पाथरी (जि.परभणी) येथे श्री साईबाबा तीर्थक्षेत्र विकास आराखड्याच्या रुपये १४९ कोटींच्या विकास आराखड्याच्या मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली असलेल्या उच्च्याधिकार समितीची बैठक सन २०२२ मध्ये वा त्यादरम्यान घेण्यात आली होती, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, वारंवार त्रुटया काढून मान्यता देण्याबाबत विलंब करण्यात येत असल्याबाबत स्थानिक लोकप्रतिनिधी यांनी माहे नोव्हेंबर, २०२२ मध्ये वा त्यादरम्यान मा.मुख्यमंत्री महोदयांकडे लेखी आक्षेप नोंदविला आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने श्री साईबाबा तीर्थक्षेत्र विकास आराखड्यास शिखर समितीची मान्यता व निधी उपलब्धता याबाबत मा.मुख्यमंत्री महोदय यांच्यास्तरावरून कोणती अंतिम कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.एकनाथ शिंदे (२०-१२-२०२२) :** (१) हे खरे आहे.

पाथरी (जि.परभणी) येथे श्री साईबाबा तीर्थक्षेत्र विकास आराखड्यासंदर्भात मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील उच्चाधिकार समितीची बैठक दिनांक २०/०९/२०२२ रोजी पार पडली.

(२) स्थानिक लोकप्रतिनिधी यांचे दिनांक ०१/११/२०२२ रोजीचे निवेदन मा.मुख्यमंत्री कार्यालयास प्राप्त झाले आहे.

(३) मुख्य सचिव यांनी दिनांक २०/०९/२०२२ रोजीच्या बैठकीमध्ये दिलेल्या निर्देशानुसार, मुख्याधिकारी, पाथरी नगरपरिषद यांनी रुपये ९१.८० कोटींचा सुधारित आराखडा तयार करुन जिल्हाधिकारी, परभणी यांच्याकडे सादर केला आहे.

• सदर आराखड्यास जिल्हा कार्यकारी समिती व मा.पालकमंत्री यांच्या अध्यक्षतेखालील जिल्हास्तरीय समितीची मंजूरी मिळाल्यानंतर सदर सुधारित आराखडा विभागास सादर करण्याबाबतची कार्यवाही जिल्हाधिकारी, परभणी यांच्यास्तरावर सुरु आहे.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## मुस्लीम समाजास आरक्षण देण्याबाबत

**(१३) १५९६६ (०३-१२-२०२२) श्री.अब्दुल्लाखान दुर्राणी, श्री.सतिश चव्हाण, श्री.विक्रम काळे : तारांकित प्रश्न क्रमांक १२७१५ ला दिनांक १५ मार्च, २०२२ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मुस्लिम समाजाला शैक्षणिक संस्थांमध्ये आणि नोकरीमध्ये पाच टक्के आरक्षण देण्याबाबतचा अध्यादेश निर्गमित करण्याबाबत, तसेच त्याबाबतचा कायदा तयार करुन शैक्षणिक वर्ष सुरू होण्याअगोदर मुस्लिम समाजाला आरक्षण देण्याचे शासनाच्या विचाराधीन आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, मुस्लिम समाजाला आरक्षण देण्याबाबत घटनेतील तरतूदी तपासून निर्णय घेण्याची शासनाने भूमिका स्पष्ट केली आहे काय, याबाबत सविस्तर माहिती काय आहे,

(३) असल्यास, मुस्लिम समाजास सामाजिक, शैक्षणिक तसेच आर्थिक मागास कारणांच्या आधारावर आरक्षण देण्यात यावे, असे आदेश मा.उच्च न्यायालयाने दिलेले आहेत, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन मुस्लिम समाजास आरक्षण देण्याबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे, याबाबत थोडक्यात सविस्तर माहिती काय आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.एकनाथ शिंदे (१९-१२-२०२२) :** (१) हे खरे नाही.

(२), (३) व (४) सामान्य प्रशासन विभागाच्या दिनांक ०९/०७/२०१४ रोजीच्या अध्यादेशानुसार मुस्लिम (विशेष मागासप्रवर्ग) समाजासाठी नोकरीमध्ये व शैक्षणिक संस्थामध्ये प्रवेशासाठी ५ टक्के आरक्षण देण्यात आले होते. यामध्ये मुस्लिम धर्मातील एकूण ५० मागास घटकांना आरक्षणाचा लाभ अनुज्ञेय राहणार होता. तथापि, याबाबत मा.उच्च न्यायालयात याचिका दाखल करण्यात आल्या आहेत. मा.उच्च न्यायालयाने दिनांक १४/११/२०१४ रोजी या प्रकरणी अंतरिम निर्णय दिला आहे. सदर अंतरिम आदेशाद्वारे शासकीय व अनुदानित शैक्षणिक संस्थेमध्ये प्रवेशासाठी दिलेले आरक्षण अबाधित ठेवण्यात आलेले आहे. परंतु खाजगी विनाअनुदानित संस्थांमधील प्रवेश व शासकीय सेवेतील भरतीसाठी दिलेल्या आरक्षणाला स्थगिती दिली आहे. सदर अध्यादेशाचे दिनांक २३/१२/२०१४ पर्यंत कायद्यात रुपांतर न झाल्याने अध्यादेश व्यपगत झाला आहे. तथापि, दिनांक ०९/०७/२०१४ ते दिनांक २३/१२/२०१४ या काळातील शासकीय तसेच अनुदानित शैक्षणिक संस्थांमधील प्रवेश अबाधित ठेवण्यात आलेले आहेत. तसेच दिनांक ०९/०७/२०१४ ते दिनांक १४/११/२०१४ या दरम्यानच्या काळातील शासकीय सेवेत झालेल्या नियुक्त्या संरक्षित करण्यात आलेल्या आहेत.

(५) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## आटपाडी (जि.सांगली) शहरातील ओढ्याचे संवर्धन व सुशोभीकरण करण्याबाबत

**(१४) १६१२५ (०३-१२-२०२२) श्री.गोपिचंद पडळकर :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) आटपाडी (जि.सांगली) शहरांमधून जाणाऱ्या ओढ्यामध्ये शहरातील विविध भागातून येणारे सांडपाणी, साठविलेला कचरा ओढ्यात समाविष्ट होत असल्याने ओढ्याला नाल्याचे स्वरुप येवून ओढ्याची दुरवस्था झाली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदर ओढ्याचे संवर्धन व सुशोभीकरण करण्याची मागणी स्थानिक लोकप्रतिनिधींनी मा.मुख्यमंत्री यांचेकडे दिनांक २० ऑक्टोबर, २०२२ रोजी वा त्यासुमारास पत्राद्वारे केली आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन आटपाडी शहरातील ओढ्याचे संवर्धन व सुशोभीकरण करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.एकनाथ शिंदे (२०-१२-२०२२) :** (१) व (२) होय, हे खरे आहे.
(३) • आटपाडी नगरपंचायत अंतर्गत शहराच्या मध्यवर्ती भागातून शुक्र ओढा वाहत असून त्याची रुंदी ५० मीटर पासून १०० मीटर पर्यंत आहे व त्याची लांबी २५०० मीटर इतकी आहे.

• सदरच्या ओढापात्राचे पाणी वाहते ठेवण्यासाठी कॅनॉल करणे, संरक्षक भिंत बांधणे, रस्ते व फुटपाथ करणे, सोलर स्ट्रीटलाईट बसविणे, ओपन जिम करणे, रनिंग ट्रॅक करणे, ओपन ग्राऊंड करणे, कारंज्या करणे, विद्युत रोषणाई करणे, झाडे व फुलझाडे लावणे इत्यादी कामे करण्याबाबतचा नगरपंचायतीने सर्व्हे पूर्ण केला असून त्याचे अंदाजपत्रक तयार करण्याचे काम नगरपंचायत स्तरावर करण्यात येत आहे.

• सदर कामाचे अंदाजपत्रक तयार झाल्यानंतर यासाठी लागणाऱ्या निधी मागणीचा प्रस्ताव शासनास सादर करण्याचे आटपाडी नगरपंचायतीचे नियोजन आहे.

• दरम्यान सदरच्या ओढापात्राचे संवर्धन व सुशोभीकरण करण्यासाठी विशेष वैशिष्ट्यपूर्ण योजनेतून रुपये ६ कोटी इतका निधी उपलब्ध करुन द्यावा, अशी मा.लोकप्रतिनिधी यांनी दिनांक १९/१०/२०२२ रोजीच्या पत्रान्वये शासनास विनंती केली आहे. यासंदर्भातील बाब शासनाच्या विचाराधीन आहे.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## उल्हासनगर (जि.ठाणे) रेल्वे स्टेशनसमोरील वालधुनी नदीवर पूल बांधण्याबाबत

**(१५) १६२८२ (०६-१२-२०२२) श्री.प्रसाद लाड :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) उल्हासनगर (जि.ठाणे) महानगरपालिकेच्या कार्यक्षेत्रातील उल्हासनगर रेल्वे स्टेशनसमोर असणाऱ्या वालधुनी नदीवर ४० वर्षापूर्वी बांधण्यात आलेला पूल कमी उंचीचा असल्याने दरवर्षी पावसाळयात सदर पूलावरुन पाणी भरुन वाहत असल्याने वाहतूक ठप्प होत असल्याचे निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, सदरहू जीर्ण झालेला पूल माहे एप्रिल, २०२२ मध्ये तोडण्यात येवून पुलाची पुनर्बांधणी करण्याकरीता उल्हासनगर महानगरपालिकेने रुपये ४ कोटी निधीची मंजूरी दिली असून ९ महिन्यांचा कालावधी होऊनही नवीन पूल उभारणीचे काम सुरु करण्यात आले नाही, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, सदरहू पूलाअभावी उल्हासनगर रेल्वे स्टेशनवर येणाऱ्या नागरिकांना तसेच नेहरु चौक, खेमानी, पंजाब कॉलनी, फॉरवड लाईन इ. परिसरात ये-जा करणाऱ्या नागरिकांची गैरसोय होत असल्याने सदरहू पुलांच्या पुनर्बांधणीचे काम लवकर पूर्ण करण्याबाबत नागरिकांनी शासनाकडे मागणी केली आहे, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन उल्हासनगर रेल्वे स्टेशनसमोरील वालधुनी नदीवर पूल बांधण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.एकनाथ शिंदे (२०-१२-२०२२) :** (१) हे खरे आहे.
(२) उल्हासनगर रेल्वे स्टेशनसमोर असणाऱ्या वालधुनी नदीवरील जीर्ण झालेला पूल अत्यंत धोकादायक स्थितीत असल्याने कोणतीही दुर्घटना घडू नये याकरीता सदर पूल माहे जून, २०२२ मध्ये उल्हासनगर महानगरपालिकेमार्फत पूर्णपणे निष्कासित करण्यात आला.

सदर पुलाच्या बांधकामाकरीता निविदा प्रक्रिया करुन मे. झा.पी. ॲण्ड कंपनी यांचे नावे दिनांक ३०/०३/२०२२ रोजी कार्यारंभ आदेश निर्गमित करण्यात आले आहेत.

सदर निविदा ई.पी.सी. पध्दतीची असल्याने पुलाच्या बांधकामाचे प्राकलन, नकाशे, आराखडे संबंधित एजन्सीमार्फत तयार करण्यात येतात. सदर बांधकामाचे नकाशे, आराखड्यांना इंजिनिअरींग कॉलेज, पुणे यांची मान्यता होऊन ते दिनांक २७/०७/२०२२ रोजी उल्हासनगर महानगरपालिकेस प्राप्त झाले.

सन २०२२ मध्ये ऑक्टोबर महिन्याच्या अखेरपर्यंत पाऊस सुरु असल्याने व कामाच्या ठिकाणी पाणीपुरवठा विभागाच्या जलवाहिन्या असल्याने सदर जलवाहिन्या स्थलांतरणाची कार्यवाही पाणीपुरवठा विभागामार्फत सुरु आहे. या कारणांमुळे वालधुनी नदीवरील पुलाच्या बांधकामास उशीर झाला, असे उल्हासनगर महानगरपालिकेने कळविले आहे.
(३) हे खरे आहे.

नागरिकांची गैरसोय होऊ नये याकरीता सदर अस्तित्वातील पूल तोडण्यापूर्वी पर्यायी रहदारी व्यवस्था चांदीबाई कॉलेज समोरील पुलावरुन सुरळीत करण्यात आली आहे, असे उल्हासनगर महानगरपालिकेने कळविले आहे.
(४) पाणीपुरवठा विभागाच्या जलवाहिन्या स्थलांतरीत झाल्यानंतर सदर पुलाचे बांधकाम लवकरात लवकर पूर्ण करण्याचे नियोजन आहे, असे उल्हासनगर महानगरपालिकेने कळविले आहे.
(५) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## पनवेल (जि.रायगड) महानगरपालिका हद्दीत प्रदूषण मोजमाप करण्याची यंत्रणा कार्यान्वित करण्याबाबत

**(१६) १६२८५ (०६-१२-२०२२) श्री.प्रसाद लाड, श्री.जयंत पाटील :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) महाराष्ट्र प्रदूषण नियंत्रण मंडळाने पनवेल (जि.रायगड) महानगरपालिका हद्दीत कळंबोली वसाहत व तळोजा औद्योगिक वसाहत या दोन ठिकाणी रुपये १ कोटी खर्च करुन हवेतील प्रदूषणाची मोजमाप करण्याची यंत्रणा तत्कालिन शासनाच्या कालावधीत सुमारे १ वर्षापूर्वी बसविण्यात आली होती, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदरहू यंत्रणा अंडरटेस्टिंग (चाचणी अंतर्गत) मध्ये असल्याने उक्त यंत्रणा बसवून कार्यान्वित झाली नसल्याची तक्रार स्थानिक नागरिकांनी महाराष्ट्र प्रदूषण नियंत्रण मंडळ प्रशासनाकडे केली आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, पनवेल महानगरपालिका हद्दीत हवेतून होणाऱ्या प्रदूषणाची गंभीर समस्या निर्माण झाली असून हवेतून होणारे प्रदूषण रोखणारी यंत्रणा कार्यान्वित झाली नसल्याने प्रदूषणामुळे पनवेल महानगरपालिका हद्दीतील रहिवाशांना विविध व्याधी / आजाराची लागण होत आहे, हे ही खरे आहे काय,
(४) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन पनवेल महानगरपालिका हद्दीत प्रदूषण मोजमाप करण्याची यंत्रणा कार्यान्वित करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.एकनाथ शिंदे (२१-१२-२०२२) :** (१) हे खरे आहे.
(२) हे खरे नाही.
अशा प्रकारची तक्रार महाराष्ट्र प्रदूषण नियंत्रण मंडळाकडे प्राप्त झालेली नाही.
(३) हे खरे नाही.
(४) महाराष्ट्र प्रदूषण नियंत्रण मंडळामार्फत पनवेल महानगरपालिका हद्दीत प्लॉट नं. १०, सेक्टर-०२, ई, कळंबोली तसेच म.औ.वि.मं., तळोजा या ठिकाणी अविरत वातावरणीय हवा गुणवत्ता तपासणी केंद्रे बसविण्यात आली असून ती कार्यान्वित आहेत.
(५) प्रश्न उद्भवत नाही.

---

## नवी मुंबई महानगरपालिकेच्या शालेय इमारतीमध्ये सी.सी.टी.व्ही. यंत्रणा बसवून कार्यान्वित करण्याबाबत

**(१७) १६४६९ (०६-१२-२०२२) श्री.राजहंस सिंह :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) नवी मुंबई महानगरपालिका शाळेच्या इमारतीमध्ये विद्यार्थ्यांच्या सुरक्षेच्या दृष्टीने सी.सी.टीव्ही. यंत्रणा बसविण्यासाठी ४ वर्षांपूर्वी महासभेने मान्यता दिली असूनही शाळेच्या इमारतीमध्ये सी.सी.टीव्ही. यंत्रणा बसविण्यात आली नसल्याचे माहे नोव्हेंबर, २०२२ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने शालेय विद्यार्थ्यांच्या बाबतीत अनुचित गैरप्रकार घडू नये तसेच विद्यार्थ्यांच्या सुरक्षेच्या दृष्टीने शाळेच्या इमारतीमध्ये सी.सी.टी.व्ही. यंत्रणा बसवून कार्यान्वित करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.एकनाथ शिंदे (२०-१२-२०२२) :** (१) व (२) • नवी मुंबई महानगरपालिकेच्या प्राथमिक व माध्यमिक शाळेतील विद्यार्थ्यांच्या सुरक्षेच्या दृष्टीने शाळांमध्ये सी.सी.टी.व्ही. कॅमेरे बसविणे, त्याची देखभाल व दुरूस्ती करणेकरीता ऑक्टोबर, २०१८ मध्ये महासभेने मान्यता दिली, हे खरे आहे.

• प्राप्त मान्यतेनुसार, नवी मुंबई महानगरपालिकेच्या सर्व प्राथमिक व माध्यमिक शाळेच्या इमारतींमध्ये, शाळेच्या आवारात व प्रवेशद्वारावर सी.सी.टी.व्ही. बसविणे व देखभाल व दुरूस्ती करणे या कामाकरीता सन २०१८-१९ पासून ७ वेळा निविदा प्रसिध्द करण्यात आल्या आहेत. तथापि, सदर निविदांना निविदाकारांकडून मिळणारा अल्प प्रतिसाद व कोविड-१९ च्या प्रादुर्भावामुळे निविदा प्रक्रियेस विलंब झाला.

• तथापि, सध्या दिनांक १०/०५/२०२२ रोजी निविदा मागविण्यात आल्या असून, सदर निविदेकरीता एकूण १५ ठेकेदारांच्या निविदा प्राप्त झालेल्या आहेत.

• निविदाकारांकडून सादर केलेल्या कागदपत्रांची तांत्रिक छाननी केली असता, एकूण ०४ निविदाकारांच्या निविदा पात्र झाल्या असून, न्यूनतम दरपत्रक धारकास कार्यादेश देण्याची कार्यवाही महानगरपालिका स्तरावर सुरू असल्याचे, नवी मुंबई महानगरपालिकेने कळविले आहे.

(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## मौजे उमरा (ता.अकोट, जि.अकोला) उपकेंद्रातील आरोग्यसेविकांची रिक्त पदे भरण्याबाबत

**(१८) १६७०५ (२९-११-२०२२) श्री.अमोल मिटकरी, श्री.विक्रम काळे, श्री.शशिकांत शिंदे, श्री.सतिश चव्हाण :** सन्माननीय **ग्रामविकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मौजे उमरा (ता.अकोट, जि.अकोला) येथील आरोग्य उपकेंद्रात आरोग्य सेविकेची दोन तर आरोग्य सेवकाचे एक पद दीर्घकाळापासून रिक्त असल्याचे दिनांक २ नोव्हेंबर, २०२२ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उपकेंद्रात कर्मचारी वर्ग नसल्यामुळे तेथील उपचार घेणाऱ्या गोरगरीब जनतेची अत्यंत गैरसोय होत असून खासगी रुग्णालयात उपचार घ्यावे लागत आहेत, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले, त्यानुषंगाने सदर मौजे उमरा उपकेंद्रात रिक्त असलेली आरोग्य सेविका व आरोग्य सेवकांची पदे भरण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.गिरीश महाजन (१५-१२-२०२२) :** (१) होय, हे खरे आहे.

(२) हे खरे नाही.

मौजे उमरा (ता.अकोट, जि.अकोला) येथील आरोग्य उपकेंद्रात डिसेंबर, २०२० पासून समुदाय आरोग्य अधिकारी रूजू झाले आहेत. तसेच आरोग्य सेविकेचा अतिरिक्त कार्यभार कंत्राटी आरोग्य सेविकेकडे व आरोग्य सेवक या पदाचा पदभार आरोग्य सेवकाकडे दिला आहे. गोरगरीब जनतेला सेवा मिळत असून रूग्णांची गैरसोय होत नाही.

(३) इतर प्राथमिक आरोग्य केंद्रातील कर्मचाऱ्यांची सेवा अधिग्रहित करुन सदर आरोग्य उपकेंद्रातील कामकाज सुरळीत सुरु आहे. तसेच ग्रामविकास विभाग शासन निर्णय दिनांक २१/११/२०२२ व शासन शुध्दीपत्रक दिनांक २५/११/२०२२ नुसार पदभरतीचा कालबध्द कार्यक्रम निश्चित करण्यात आला असून पदभरतीची कार्यवाही सुरु आहे.

(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## अकोला जिल्ह्यात टू-जी प्रकारातील ई-पॉस मशिनद्वारे धान्य वितरणात विलंब होत असल्याबाबत

**(१९) १६७०७ (०७-१२-२०२२) श्री.अमोल मिटकरी, श्री.शशिकांत शिंदे, श्री.विक्रम काळे, श्री.सतिश चव्हाण :** सन्माननीय **अन्न व नागरी पुरवठा आणि ग्राहक संरक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) अकोला जिल्ह्यात अन्नधान्य वितरण नोंदीसंदर्भात १३ हजार ६१ ई-पॉस मशिन्स असून त्या टु-जी प्रकारातील आहेत तथापि, सध्या फोर-जी सेवा कार्यरत झाल्यामुळे टू-जी प्रकारातील मशिन्स ह्या कालबाह्य ठरत आहेत, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, त्यामुळे शासनाच्या गरीब कल्याण योजनेसह पंतप्रधान गरीब मोफत धान्य वाटप योजना व दिवाळीनिमित्त शासनाच्या आनंदाचा शिधा वाटप या सारख्या योजनांचा सदर कालबाह्य मशिन्सवर ताण पडत असल्यामुळे वेळोवेळी नेटवर्कचा प्रॉब्लेम निर्माण होऊन गोरगरीब ग्राहक जनतेला अन्नधान्य मिळण्यापासून वंचित रहावे लागत असल्यचे व त्यामुळे दुकानदार व ग्राहक यांचेमध्ये अकारण वादविवाद होत असल्याचे दिनांक ६ ऑक्टोबर, २०२२ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, सदर कालबाह्य झालेल्या ई-पॉस मशिन्स अनेक स्वस्त धान्य दुकानदारांनी जिल्हा पुरवठा कार्यालयात परत जमा केल्या असल्याचेही निदर्शनास आले आहे, हेही खरे आहे काय,

(४) असल्यास, याबाबत निर्माण होणाऱ्या तांत्रिक अडचणी लक्षात घेऊन शासनाने दुकानदारांना उच्च प्रतिच्या व प्रभावी कनेक्टिव्हिटी असलेल्या मशिन्स देण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत?

**श्री.रविंद्र चव्हाण (१६-१२-२०२२) :** (१) अकोला जिल्ह्यात अन्नधान्य वितरणाकरीता १,०६१ ई-पॉस मशीन कार्यरत असून सदर मशीन, २०१७ साली उपलब्ध करून देण्यात आल्याने २-G तंत्रज्ञानावर आधारित आहेत. सदर मशीन २-G तंत्रज्ञान आधारित असल्या तरी त्याद्वारे लाभार्थ्यांचे आधार प्रमाणिकरणाची प्रक्रिया सुरळीत सुरू आहे.

(२) व (३) सार्वजनिक वितरण व्यवस्थेंर्तगत AePDS (Adhar enabled Public Distribution System) प्रणाली मार्फत धान्य वितरण करण्यात येते. सदर कालावधीत भारतीय विशिष्ट ओळख प्राधिकरण (UIDAI) यांचेकडील आधार सर्व्हरमध्ये काही कालावधीकरीता Request time out error येत होता, तसेच AePDS प्रणालीकरीता घेण्यात आलेल्या Cloud सर्व्हरमध्येही तांत्रिक समस्या निर्माण झाल्याने राष्ट्रीय अन्न सुरक्षा योजना, प्रधानमंत्री गरीब कल्याण योजना व दिवाळी निमित्त शासनाच्या आनंदाचा शिधा वाटप करतांना धान्य वितरणात काही कालावधीसाठी अडचणी येते होत्या. तथापि, सदर तांत्रिक अडचण दूर करण्यात आली असून आता धान्य वितरण सुरळीत सुरू आहे. तांत्रिक अडचणीमुळे लाभार्थ्याला अन्नधान्य मिळाले नाही तर सदर महिन्याचे धान्य ई-पॉस मशीन मध्ये कॅरी फॉरवर्ड सुविधा उपलब्ध करुन त्यापुढील महिन्यात लाभार्थ्यांला धान्याचा लाभ देण्यात येतो. त्यानुसार लाभार्थी अन्नधान्यापासून वंचित राहू नये, याबाबत काळजी घेण्यात येते.

अकोला जिल्ह्यामध्ये तालुकास्तरीय तहसिलदार यांचाकडून रास्तभाव दुकानदारांनी ई-पॉस मशीन जमा केल्याची माहिती प्राप्त झालेली नाही.

(४) सार्वजनिक वितरण व्यवस्थेचे संगणकीकरण प्रकल्पांतर्गत रास्तभाव दुकानांत नवीन ई-पॉस मशीन बसविण्याकरीता दिनांक ०१/०७/२०२२ रोजी निविदा प्रसिध्द करण्यात आली. त्यानुसार नवीन ई-पॉस मशीन बसविण्याकरीता ३ System Integrators यांची निवड करण्यात आली असून उच्चाधिकार समितीच्या मान्यतेने रास्तभाव दुकानदार यांना लवकरात लवकर नवीन ४G तंत्रज्ञान व Iris Scanner या तंत्रज्ञान असणाऱ्या मशीन उपलब्ध करून देण्याबाबत शासनस्तरावर कार्यवाही सुरू आहे.
(५) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## सोलापूर विद्यापीठाचे कुलसचिव पद बेकायदेशीरपणे भरल्याबाबत

**(२०) १६७५२ (२१-१२-२०२२) श्री.अंबादास दानवे :** सन्माननीय **उच्च व तंत्र शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) मुंबई विद्यापिठाने कुलसचिव पदासाठी नाकारलेल्या व उप-कुलसचिव म्हणून नियुक्तीसाठी आवश्यक असलेला अनुभव नसतानाही श्रीमती योगिनी घारे यांची सोलापूर विद्यापीठाच्या कुलसचिव पदी नियुक्ती करण्यात आली असल्याचे माहे नोव्हेंबर, २०२२ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, दिनांक ३ जुलै, २००४ रोजीच्या तरतुदीनुसार प्रभारी नेमणुकीचा कालावधी कुलसचिव पदासाठी ग्राह्य नसताना श्रीमती योगिनी घारे यांचा प्रभारी प्राचार्य म्हणून असलेला सात वर्षाचा अनुभव ग्राह्य धरुन उप-कुलसचिव पद देण्यात आले होते, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले आहे, तद्नुषंगाने पात्रता नसतानाही सोलापूर विद्यापीठाच्या कुलसचिव पदी नियमबाहय केलेली नेमणूक रद्द करण्याबाबत कोणती कार्यवाही केली तसेच सोलापूर विद्यापीठाच्या कुलसचिव पदी नियमबाह्य नेमणूक करणाऱ्या दोषींवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत (दादा) पाटील (२२-१२-२०२२) :** (१) व (२) हे अंशत: खरे आहे.
मुंबई विद्यापीठात सहायक कुलसचिव व उपकुलसचिव पदावर करण्यात आलेल्या विविध कर्मचाऱ्यांच्या नियुक्ती संदर्भातील तक्रारीच्या अनुषंगाने संचालक, उच्च शिक्षण यांच्याकडून शासनास अहवाल प्राप्त झालेला आहे.
(३) संचालक, उच्च शिक्षण यांच्याकडून प्राप्त अहवालाची तपासणी करण्यात येत असून तपासणी अंती आवश्यक ती कार्यवाही करण्यात येईल.
(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

**विधान भवन :**
**मुंबई.**

**राजेन्द्र भागवत**
**प्रधान सचिव,**
**महाराष्ट्र विधानपरिषद.**

मुद्रणपूर्व सर्व प्रक्रिया महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालयाच्या संगणक यंत्रणेवर करण्यात आली आहे.
मुद्रण: शासकीय मध्यवर्ती मुद्रणालय, मुंबई.